राज्यात Overseas Placement and Skill Development Center सुरु करण्यासाठी कार्यकारी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१६/प्र.क्र.१८४/अभियान-१**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रातून मोठ्या संख्येने परदेशात नोकरीकरिता जाणाऱ्या इच्छूक व पात्र उमेदवारांना कायदेशिर मार्गाचा अवलंब करुन पाठविणे शक्य होण्यासाठी त्याचप्रमाणे परेदशात ज्या कौशल्याची मागणी वाढत आहे अशा कौशल्याचे प्रशिक्षण इच्छूक व पात्र उमेंदवारांना देऊन त्यांना परदेशात नोकरीच्या संधी उपलब्ध करुन देण्याकरीता सद्य:स्थितीत राज्य शासनाची अशी कोणतीही यंत्रणा नसल्याने परदेशात नोकरीकरिता जाण्यास इच्छूक उमेदवारांना नोंदणीकृत खाजगी संस्थांमार्फत (Overseas Placement Agencies/Agents) परदेशात नोकरीकरिता जातांना अनेक अडचणी येत असल्याचे दिसून आले आहे. त्याचबरोबर सदर संस्थांमार्फत उमेदवारांना पासपोर्ट, व्हिसा इ. अनुषंगीय कागदपत्रे मिळवून देतांना शुल्क म्हणून अवाजवी रक्कमेची मागणी करुन आर्थिक शोषण केले जात असल्याची बाब नाकारता येत नाही. यावर मात करण्यासाठी मा.मुख्यमंत्री आणि मा.मंत्री,कौशल्य विकास व उद्योजकता यांच्यामध्ये झालेल्या चर्चेदरम्यान महाराष्ट्र राज्याने एक अत्यंत महत्वाकांक्षी "Overseas Placement and Skill Development Center" विकसित करणेबाबत दृष्टीकोन (Vision) निश्चित केला आहे.

महाराष्ट्र राज्याच्या कौशल्य विकास विभागाद्वारे विकसित केला जाणारा "Overseas Placement and Skill Development Center" हा अभिनव उपक्रम असून केंद्र शासनाच्या इमिग्रेशन ॲक्ट ,१९८३ या कायद्यामध्ये नमूद केलेल्या प्रावधानांतर्गत सदर उपक्रम राबविण्याचे प्रस्तावित आहे. उक्त कायद्यामध्ये परदेशामध्ये नोकरीकरिता जाणाऱ्या उमेदवारांची नोकरभरती प्रक्रिया व त्यानुषंगीक बाबींबाबतची प्रक्रिया स्पष्ट नमूद करण्यात आली आहे.

त्यानुषंगाने राज्यात सदर केंद्रे स्थापन करण्यासाठी प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे अध्यक्षतेखाली कार्यकारी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील परदेशात नोकरीकरिता जाण्यास इच्छूक व पात्र असलेल्या उमेदवारांच्या परदेशात रोजगार प्राप्त होण्यासाठी सामोरे जावे लागणा-या सर्व समस्यांवर समाधानकारक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने व राज्यातील कुशल/अर्धकुशल/अकुशल मनुष्यबळाच्या परदेशातील मागणीनुसार इच्छूक उमेदवारांचा पुरवठा करणे याकरिता सर्वप्रथम मुंबई व नागपूर या दोन जिल्ह्यांच्या ठिकाणी "Overseas Placement and Skill Development Center" सुरु करण्याचे नियोजिले आहे. सदर दोन्ही जिल्ह्यांच्या ठिकाणी केंद्र शासनाच्या अखत्यारीतील पारपत्र कार्यालयेही (Passport Offices) कार्यरत आहेत. याचा फायदा नोकरीकरिता परदेशात जाण्यास इच्छूक असलेल्या राज्यातील उमेदवारांना मोठ्या प्रमाणात होण्यासाठी चांगली सुविधा शासनामार्फत निर्माण करण्यासाठी करता येईल.

२. सदर Overseas Placement and Skill Development Center स्थापन करण्यासाठी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेनुसार प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे अध्यक्षतेखाली खालील अधिकाऱ्यांची कार्यकारी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | - | अध्यक्ष |
| २) | अ.मु.स./प्रधान सचिव, गृह विभाग अथवा त्यांचे सहसचिव/ उपसचिव स्तरावरील प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | अ.मु.स./प्रधान सचिव, नियोजन विभाग अथवा त्यांचे सहसचिव/उपसचिव स्तरावरील प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | अ.मु.स./प्रधान सचिव , वित्त विभाग अथवा त्यांचे सहसचिव उपसचिव स्तरावरील प्रतिनिधी/ | - | सदस्य |
| ५) | अ.मु.स./प्रधान सचिव ,कामगार विभाग अथवा त्यांचे सहसचिव/उपसचिव स्तरावरील प्रतिनिधी | - | सदस्य |
| ६) | अ.मु.स./प्रधान सचिव ,उद्योग विभाग अथवा त्यांचे सहसचिव/उपसचिव स्तरावरील प्रतिनिधी | - | सदस्य |
| ७) | मुख्य कार्यकारी अधिकारी ,महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई | - | सदस्य |
| ८) | सह/उप सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | - | सदस्य सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

Overseas Placement & Skill Development Centre मध्ये इच्छूक व पात्र असलेल्या उमेदवारांना खालील सुविधा प्रदान करण्याच्या दृष्टीने सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्वावर (PPP) स्थापन करण्याच्या सुयोग्य भागिदाराची निवड करण्यासाठी या क्षेत्रामध्ये अनुभव असलेल्या नामांकित कंपन्यांकडून इरादापत्र मागविण्याची बाब पडताळून पहाणे.

१) नोंदणी व परदेशात रोजगाराची उपलब्धता (Registration & Overseas Placement)

२) माहिती, मार्गदर्शन व समुपदेशन (Information, Guidance & Counselling)

३)पारपत्र, व्हिसा व हवाई प्रवासाबाबत मार्गदर्शन (Passport, Visa & Air Ticket Assistance)

४) कौशल्य विकास प्रशिक्षण (Skill Development Training)

५) कौशल्य वृद्धी (Skill Up gradation for overseas Job)

६) रोजगाराची उपलब्धता, रोजगाराबाबत संशोधन व विकास (Job Forecasting, Research and Development)

७) कामगार कल्याण (Labour Welfare)

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०५१५५७१८४९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed080355ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.01.05 16:01:51 +05'30'

( सं.गि. पाटील )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव ,मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री,कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय, मुंबई,
५. मा.मुख्य सचिव, मंत्रालय , मुंबई,
६. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव ,मंत्रालय , मुंबई,
७. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
९. उपसचिव/अवर सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०.आयुक्त, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था,मुंबई,
१२.संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य ,मुंबई,
१३.सहसंचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नागपूर/ अमरावती/औरंगाबाद/ नाशिक,
१४.उपसंचालक, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता , प्रादेशिक कार्यालय , मुंबई/पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद/ नाशिक,
१५. निवड नस्ती/ अभियान-१.